**मा. राष्ट्रीय मानवी हक्क आयोग, नवी दिल्ली यांच्या आदेशानुसार श्रीमती शुभांगी सुदर्शन हपसे यांना रु. २५,०००/- इतकी नुकसान भरपाई रक्कम अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रामाहआ-२०२२/प्र.क्र.७६३/कु.क**
१० वा मजला, बी विंग, गो.ते.रुग्णालय संकुल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि.मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीखः १२ जून, २०२३

**वाचा -**

१) मा. राष्ट्रीय मानवी हक्क आयोग, नवी दिल्ली यांचे आदेश दि. २५/०४/२०२३ चे आदेश
२) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांचे जा. क्र.राकुकका/माता आरोग्य/कक्ष-१०(ब)/राष्ट्रीय मानवी हक्क आयोग, नवी दिल्ली केस क्र. ३५९०/१३/३२/२०२२/२९६७४-७७/२०२३, दि. ०२/०६/२०२३ व ०८/०६/२०२३ चे पत्र.

**प्रस्तावना -**

यवतमाळ जिल्ह्यातील विड्ूळ प्राथमिक आरोग्य केंद्रावर वैद्यकीय अधिकारी नसल्यामुळे श्रीमती. शुंभागी सुदर्शन हपसे यांच्या नवजात बालकाचा उपचाराअभावी मृत्यू झाल्याप्रकरणी राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाकडे तक्रार दाखल झाली होती. राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाने क्र. ३५९०/१३/३२/२०२२ अन्वये प्रकरण दाखल करून घेतले. आयोगाच्या तक्रारीच्या अनुषंगाने आयोगाकडे प्रकरणाचा अहवाल सादर केला होता. आयोगाने दि. २५.०४.२०२३ च्या आदेशानुसार श्रीमती. शुंभागी सुदर्शन हपसे यांना रु. २५,०००/- इतकी नुकसान भरपाईची रक्कम दि. १६.०६.२०२३ पूर्वी अदा करावी असे आदेशीत केलेले आहे. त्यानुसार श्रीमती. हपसे यांना रु. २५,०००/- इतकी रक्कम मंजूर करण्याची बाब विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

राष्ट्रीय मानवी हक्क आयोग प्रकरण क्रमांक ३५९०/१३/३२/२०२२, दि. २५.०४.२०२३ च्या आदेशानुसार श्रीमती. शुंभागी सुदर्शन हपसे यांना रु. २५,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस हजार फक्त) एवढी नुकसान भरपाईची रक्कम मंजूर करण्यात येत आहे.

२. प्रस्तुत प्रकरणी जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांना आहरण संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ यांनी वरील रक्कम श्रीमती. हपसे यांना दि. १६.०६.२०२३ पूर्वी अदा करुन त्याबाबतचा अहवाल अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कार्यालय, पुणे यांच्यामार्फत दि. १६.०६.२०२३ पूर्वी शासनास सादर करावा.

३.	सदरहू रक्कम पिडीत महिलेस विहीत मुदतीपूर्वी देण्याबाबत तसेच त्याचा अहवाल शासनास पाठविण्याबाबत अतिरिक्त संचालक, राज्य आरोग्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांची जबाबदारी राहील.

४.	यासाठी होणारा खर्च मागणी क्र. आर-१, प्रधान लेखाशिर्ष २२११, कुटुंब कल्याण, ००१ संचालन व प्रशासन (०१) राज्य कुटुंब कल्याण केंद्र, (०१)(०३) जिल्हा कुटुंब कल्याण केंद्र (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) (कार्यक्रम) (२२११ ००५१) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०९१६०९५००७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by NANDKUMAR GANPAT ANDALKAR
Date: 2023.06.12 17:04:42 +05'30'
Adobe Reader version: 11.0.23

**( नंदकुमार आंदळकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे स्वीय्य सहाय्यक.
३. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक-२, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
५. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
७. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, यवतमाळ.
८. कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, यवतमाळ.
९. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई.
१०. श्रीमती. शुंभागी सुदर्शन हपसे (अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांचेमार्फत)
११. निवडनस्ती